**आदिवासीबहुल क्षेत्रातील सार्वजनिक विद्यापीठांतील आदिवासी अध्यासन केंद्रांचे बळकटीकरण व नविन आदिवासी अध्यासन केंद्रे स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१०९/ई-८७५६१०/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई : ४०००३२.
दिनांक : १७ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना :-**

सन २०११ च्या जणगणनेनुसार राज्याच्या एकूण लोकसंख्येपैकी ९.३५ टक्के आदिवासी लोकसंख्या आहे. सन २०२०-२१ मधील महाराष्ट्रातील आदिवासींचे उच्च शिक्षणातील एकूण नोंदणी प्रमाण (Gross Enrollment Ratio) १८.९ % इतके आहे, जे २८.४% या राष्ट्रीय सरासरी नोंदणीप्रमाणापेक्षा खूपच कमी आहे. गडचिरोली येथील गोंडवाना विद्यापीठाची संकल्पना आणि स्थापना प्रामुख्याने आदिवासी समुदायांच्या शैक्षणिक गरजा पूर्ण करण्याच्या दृष्टिकोनातून करण्यात आली. तथापि, महाराष्ट्रातील इतर विद्यापीठांच्या भौगोलिक क्षेत्रात राहणाऱ्या आदिवासी विद्यार्थ्यांना स्थलांतरित होऊन गोंडवाना विद्यापीठाद्वारे प्रदान केल्या जाणाऱ्या उच्च शिक्षणाच्या संधींचा लाभ घेणे शक्य होत नाही. ही बाब विचारात घेवून यासंदर्भात आदिवासीबहुल क्षेत्रातील विद्यापीठांच्या कुलगुरूंनी आस्तित्वात असलेल्या आदिवासी अध्यासन केंद्रांच्या बळकटीकरणाची तसेच आवश्यकतेनुसार नविन आदिवासी अध्यासन केंद्रे स्थापन करण्याचे प्रस्तावित केले आहे.

तसेच राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० चे सर्वसमावेशक शैक्षणिक धोरण विचारात घेता, सार्वजनिक विद्यापीठांमध्ये आदिवासी विद्यार्थ्यांसाठी स्वतंत्र सुविधा व त्याद्वारे आदिवासी विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव, स्वामी रामानंद तिर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड व मुंबई विद्यापीठ, मुंबई आदिवासी अध्यासन केंद्रे कार्यरत आहेत. सदर आदिवासी अध्यासन केंद्राना बळकटी देण्याचा तसेच आदिवासीबहुल क्षेत्रातील संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती व गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली येथे नव्याने आदिवासी अध्यासन केंद्रे स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मध्ये नमूद केलेल्या उद्दिष्टांव्यतिरिक्त, पुढील उद्दिष्टे साध्य करण्यासाठी आदिवासी अध्यासन केंद्रे निर्माण करण्यात येत आहेत.

(i) मानववंशशास्त्र अभ्यास (उदा. माडिया, गोंडी, बैगा, कोलम इ. आदिवासी भाषा), संस्कृती व जीवनशैली जतन (आदिवासी ज्ञान, कला, संस्कृती, परंपरा, रीतिरिवाज इ.)

(ii) उपजिविका अभ्यास आणि आर्थिक सक्षमीकरण (उदा.पर्यावरणीय पर्यटन (eco-tourism), वन पर्यटन, जलमार्ग व्यवस्थापन, जंगलांशी संबंधित इतर विषय उदा., धातूशास्त्र, कापड आणि त्याचे उत्पादन तंत्रज्ञान, औषधी वनस्पतींचा अभ्यास, खनिजशास्त्र, bamboo-based industries इ.)

(iii) आदिवासी विद्यार्थ्यांचे उच्च व तंत्र शिक्षणातील प्रमाण (*Gross* Enrollment Ratio) वाढविण्यासाठी त्यांना दर्जेदार शिक्षणाची व्यवस्था करणे आणि त्याद्वारे त्यांना रोजगारक्षम बनविणे.

वरील उद्दिष्टांबाबत अभ्यास व संशोधन करण्यासाठी सदर अध्यासन केंद्रे कार्यरत राहतील.

३. शासनाच्या विविध विभागांकडून राबविल्या जाणाऱ्या आदिवासी विकासासाठीच्या योजना व कार्यक्रमांचे मूल्यमापन (Evaluation), मूल्यांकन (Assessment) करणे आणि त्यासंबंधी धोरणात्मक शिफारशी करण्याची कार्यवाही संबंधित विभागांच्या निर्देशाप्रमाणे सदर अध्यासन केंद्रांमार्फत करण्यात येईल.

४. सदर अध्यासन केंद्रासाठी उच्च व तंत्र शिक्षण विभाग, आदिवासी विकास विभाग, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, जिल्हा नियोजन समिती (DPC) इ. विभागांच्या सध्याच्या योजनांनुसार प्रकल्प आधारित पद्धतीने निधी प्राप्त झाल्यावर अध्यासन केंद्रांकडून कार्यवाही (task based) करण्यात येईल.

५. सदर केंद्राच्या समन्वयासाठी “समन्वय समिती” गठीत करण्यात येत आहे. समन्वय समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील-

(१) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई- अध्यक्ष
(२) कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई- सदस्य
(३) कुलगुरु, कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव- सदस्य
(४) कुलगुरु, स्वामी रामानंद तिर्थ मराठावाडा विद्यापीठ, नांदेड- सदस्य
(५) कुलगुरु, संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती- सदस्य
(६) कुलगुरु, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली- सदस्य
(७) वरील सर्व विद्यापीठांच्या आदिवासी अध्यासन केंद्राचे संचालक- सदस्य
(८) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे- सदस्य सचिव

सदर समन्वय समितीच्या कार्यवाहीच्या अनुषंगाने उच्च शिक्षण संचालनालय, पुणे येथे एक विशेष कक्ष स्थापन करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१७१९०७५९९४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.04.17 19:09:45 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल कार्यालयाचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) कार्यालयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) कार्यालयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाज़गी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
६. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाज़गी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.

७. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई-३२.
८. कुलगुरू, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
९. कुलगुरू, कवियीत्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.
१०.कुलगुरू, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
११.कुलगुरू, संत गाडगेबाबा महाराज अमरावती विद्यापीठ, अमरावती.
१२.कुलगुरू,गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली.
१३.संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.कुलसचिव, सर्व सार्वजनिक विद्यापीठे
१५.संबंधित विद्यापीठांच्या आदिवासी केंद्रांचे संचालक (कुलसचिवांमार्फत).
१६.निवडनस्ती(विशि-४).